**१२ व्या वित्त आयोगाच्या निधीचे उपयोगिता**
**प्रमाणपत्र सादर करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
शासन परिपत्रक क्र. बाविआ-१००९/प्र.क्र.१४१/न.वि.४
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक- ३१ जुलै २००९

## परिपत्रक

सन २००९-१० हे १२ व्या वित्त आयोगाचा निधी प्राप्त होण्याचे अखेरचे वर्ष आहे. त्यामुळे १२ व्या वित्त आयोगाच्या प्राप्त झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र शासनास लवकरात लवकर पाठवून, उर्वरित निधी केंद्र शासनाकडून प्राप्त करुन घेणे आवश्यक आहे.

०२. दिनांक २८ जुलै २००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये १२ व्या वित्त आयोगाच्या मार्गदर्शक तत्वामध्ये केलेल्या सुधारणांच्या अनुषंगाने, प्राप्त अनुदानाचा विनियोग करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी तसेच दिनांक ३० जून २००९ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला व त्यापूर्वी महानगरपालिका व नगरपरिषदांकडे अखर्चित असलेला १२ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार प्राप्त निधी लवकरात लवकर विनियोगात आणून त्यासंबंधीचे विनियोग प्रमाणपत्र शासनाकडे अविलंब सादर करण्याची कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( बी. आर. माळी )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त व संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
आयुक्त, सर्व संबंधीत महानगरपालिका
मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/नगरपंचायती
प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
सचिव, नगर विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती, न.वि.-४ कार्यासन, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

--------

रोटा/एच-१३०५[४००-८-०९].